**गट-क व गट-ड मधील रिक्त पदे भरण्याबाबत समन्वय अधिकारी यांच्या नेमणुका.**

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण १००७/(४२१/२००७)सु.धा./आ(अतांत्रिक)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १५ फेब्रुवारी, २००८

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक प्रानिप-२००७/प्र.क्र.४६/०७/१३-अ, दिनांक १९ ऑक्टोबर, २००७.
२) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :संकीर्ण १००७/४२१/०७/आ(अतांत्रिक), दिनांक २३.११.२००७

**परिपत्रक :-**

१. शासन सेवेतील विविध संवर्गातील रिक्त पदे सरळ सेवेने वा पदोन्नतीने भरण्याबाबत अनुसरावयाच्या कार्यपध्दती संदर्भात सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्रमांक १ अन्वये सविस्तर सुचना निर्गमीत केलेल्या आहेत. त्याच अनुषंगाने संदर्भ क्रमांक २ च्या परिपत्रकानुसार अशी पदे भरताना पाळावयाच्या मार्गदर्शक तत्वा संदर्भात आणखी निदेश देण्यात आले आहेत. राज्य शासनाने शासन सेवेतील रिक्त पदे भरण्याबाबत विशेष मोहिम हाती घेतली असून पदोन्नतीने रिक्त पदे भरण्याची कार्यवाही दिनांक १६ फेब्रुवारी, २००८ पूर्वी करावयाची आहे. तसेच विविध संवर्गातील सरळ सेवेने नेमणूका करण्याची कार्यवाही दिनांक १६ मे, २००८ पूर्वी पूर्ण करावयाची आहे. प्रचलित आदेशानुसार **गट-क** प्रवर्गातील रिक्त पदे भरण्याकरिता जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने कार्यवाही करावयाची आहे. त्याकरिता जलसंपदा विभागांतर्गत गट-क प्रवर्गातील विविध संवर्गातील रिक्त पदांसंदर्भातील मागणीपत्र जिल्हाधिकारी यांना पाठवावयाचे आहे. तसेच गट-ड प्रवर्गातील रिक्त पदे भरण्याबाबत संबंधित नियुक्ती प्राधिकारी म्हणून संबंधित मंडळाचे अधीक्षक अभियंता यांनी भरतीची प्रक्रिया पार पाडावयाची आहे.

२. सरळ सेवेने भरावयाची रिक्त पदे विहित कालमर्यादेत भरण्या संदर्भात कार्यवाही व्हावी म्हणून या संदर्भातील समन्वय मुख्य अभियंता स्तरावर देणेबाबत दिनांक १४ फेब्रुवारी, २००८ रोजी मुख्य अभियंतां समवेत झालेल्या द्वैमासिक बैठकीमध्ये चर्चा करण्यात आली. वरिष्ठ स्तरावर अशा कार्यवाहीचे समन्वय व संनियंत्रण राहिल्यास रिक्त पदांची भरती प्रक्रिया अधिक गतीमान करता येवू शकेल व त्या संदर्भातील उत्तरदायित्व वरिष्ठ स्तरावरील एका अधिकाऱ्याकडे ठेवता येणे शक्य होईल. या बाबीचा विचार करुन खालीलप्रमाणे मुख्य अभियंता स्तरावर समन्वय अधिकारी म्हणून खालील अधिकाऱ्यांच्या नेमणूका करण्यात येत आहेत.

Vacant Post

संकेतांक क्रमांक 20141126181328 1127.

| अ.क्र. | समन्वय अधिकारी म्हणुन मुख्य अभियंता यांचे नाव व पदनाम | समन्वयासाठी जिल्हे |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | श्री.शि.मा.उपासे,<br>मुख्य अभियंता (वि.प्र.) पुणे | पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर व सोलापूर. |
| २. | श्री.सी.आय.संबुतवाड,<br>मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद. | औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, नांदेड, लातूर, बीड, उस्मानाबाद. |
| ३. | श्री.ना.लो.ग्वळे,<br>मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नाशिक. | नाशिक, अहमदनगर. |
| ४. | श्री.प्र.रा.भामरे,<br>मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव. | जळगांव, धुळे व नंदूरबार. |
| ५. | श्री.म वि.पाटील,<br>मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती. | अमरावती, अकोला, वाशिम, बुलढाणा व यवतमाळ. |
| ६. | श्री.सो.रा.सुर्यवंशी,<br>मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, नागपूर. | नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली. |
| ७. | श्री.बा.भा.पाटील,<br>मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई. | ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग. |

३. सरळ सेवा व पदोन्नती या भरती प्रक्रियेमध्ये बिंदूनामावलीस परिमंडळीय अधीक्षक अभियंता यांनी गट-क बाबत आणि गट-ड बाबत नियुक्ती प्राधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता यांनी विभागीय आयुक्त कार्यालयातील मागासवर्ग कक्ष यांची मान्यता मिळविणे, विभागीय आयुक्तांची अतिरिक्त संवर्ग कक्षाकडून उमेदवारांच्या यादीबाबत ना हरकत प्रमाणपत्र मिळविणे, जिल्हाधिकाऱ्यांकडे मागणीपत्र पाठविणे, जिल्हाधिकाऱ्यांनी जाहिरात प्रसिध्द करुन परिक्षा व निवड प्रक्रिया पूर्ण करणे इ. टप्पे अतर्भूत आहेत. **समन्वय मुख्य अभियंता** यांनी या सर्व प्रक्रियेत परिमंडळीय अधीक्षक अभियंता व त्या परिमंडळातील इतर अधीक्षक अभियंता यांना भरती प्रक्रिया पार पाडत असताना येणाऱ्या अडचणीं संदर्भात मार्गदर्शन करणे, विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी कार्यालयात या बाबींसंदर्भात येणाऱ्या अडचणींचे निराकरण करणे व आवश्यक तेथे शासन स्तरावर संपर्क साधून येणाऱ्या अडचणी दूर करुन भरती प्रक्रिया विहित वेळेत पार पाडण्याबाबत कसोशीने प्रयत्न करणे आवश्यक आहे. तसेच शासनाने वेळोवेळी याबाबत मागितलेली माहिती तात्काळ उपलब्ध करुन देणे हे देखील समन्वय मुख्य अभियंता व परिमंडळीय अधीक्षक अभियंता यांची जबाबदारी राहिल. त्या त्या

प्रादेशिक विभागातील सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांनी आवश्यक ते सर्व सहकार्य समन्वय मुख्य अभियंता यांना देणे आवश्यक राहिल.

४. त्याचप्रमाणे **गट-ड** प्रवर्गातील रिक्त पदे भरण्यासाठी जिल्हयाच्या ठिकाणी अधीक्षक अभियंता नियुक्ती प्राधिकारी आहेत. त्यामुळे ज्या एका जिल्हयाच्या ठिकाणी एकापेक्षा जास्त अधीक्षक अभियंता आहेत, तेथे निवड प्रक्रियेची द्विरुक्ती टाळण्यासाठी अशा जिल्हयाच्या ठिकाणी गट-ड प्रवर्गातील पदे भरण्यासाठी एका अधीक्षक अभियंत्याची नियंत्रक अधिकारी म्हणून नेमणूक करण्यात येत आहे. संबंधित नियंत्रक अधीक्षक अभियंता यांनी गट-ड प्रवर्गात रिक्त पदे भरण्याबाबत जाहिरात देणे, आलेल्या अर्जाची छाननी करणे, परिक्षा घेणे, मुलाखत घेणे व उमेदवारांची निवड करणे ही प्रक्रिया पार पाडावयाची आहे. हे टप्पे कशारितीने पार पाडावयाचे आहेत, त्याबाबत संदर्भ क्रमांक १ व २ प्रमाणे सविस्तर सूचना दिलेल्या आहेत. **जिल्हानिहाय अशा नियंत्रक अधीक्षक अभियंता** यांची खालीलप्रमाणे गट-ड प्रवर्गामधील निवड प्रकियेसाठी नेमणूक करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हयाचे नाव | नियंत्रक अधीक्षक अभियंता. |
|---|---|---|
| १. | पुणे | अ.अ. पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे. |
| २. | सातारा | अ.अ. कोयना बांधकाम मंडळ, सातारा. |
| ३. | सांगली | अ.अ. सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली. |
| ४. | कोल्हापूर | अ.अ. कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर. |
| ५. | सोलापूर | अ.अ. भिमा कालवा मंडळ, सोलापूर. |
| ६. | ठाणे | अ.अ. ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे. |
| ७ | औरंगाबाद | अ.अ. जायकवाडी प्रकल्प मंडळ, औरंगाबाद. |
| ८ | नांदेड | अ.अ. उर्ध्व पेनगंगा प्रकल्प मंडळ, नांदेड. |
| ९ | बीड | अ.अ. व प्रशासक, ला.क्षे.वि.प्राधिकरण बीड |
| १० | नाशिक | अ.अ. घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक. |
| ११ | जळगांव | अ.अ.व प्रशासक, ला.क्षे.वि.प्राधिकरण, जळगांव. |
| १२ | अमरावती | अ.अ. अपर वर्धा प्रकल्प मंडळ, अमरावती. |
| १३ | नागपूर | अ.अ. नागपूर पाटबंधारे मंडळ, नागपूर |

५. गट-ड प्रवर्गातील रिक्त पदे ज्या अधीक्षक अभियंतामार्फत भरावयाची आहेत त्यांनी त्यांचे मागणीपत्र वर नमूद केलेल्या त्या त्या जिल्हयातील नियंत्रक अधीक्षक अभियंता यांच्याकडे पाठवावीत. पुढील संपुर्ण कार्यवाही नियंत्रक अधीक्षक अभियंता पार पाडतील. परंतु, निवड झालेल्या उमेदवारांची

प्रत्यक्ष नियुक्ती करण्यासाठी संबंधित उमेदवारांची नावे नियंत्रक अधीक्षक अभियंता हे नियुक्तीसाठी सक्षम असलेल्या संबंधित अधीक्षक अभियंता यांच्याकडे पाठवतील. त्यानंतर सक्षम नियुक्ती प्राधिकारी म्हणून ते ते अधीक्षक अभियंता संबंधित उमेदवारांचे नियुक्तीचे सविस्तर आदेश निर्गमित करतील. जेथे जिल्हयाच्या ठिकाणी एकच अधीक्षक अभियंता आहेत तेथे तेच अधीक्षक अभियंता त्यांचे कार्यक्षेत्रातील गट-ड प्रवर्गातील निवड प्रक्रिया पूर्ण करतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावांने.

**( बा. ब. पिंगट )**
**शासनाचे उप सचिव.**

प्रत,

सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय.

सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय.

सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.

सर्व समन्वय मुख्य अभियंता (नावानिशी), जलसंपदा विभाग.

सर्व नियंत्रक अधीक्षक अभियंता (नावानिशी), जलसंपदा विभाग.

इतर मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.

सर्व अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, जलसंपदा विभाग.

सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.

सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.